**विशेष आर्थिक क्षेत्र प्रस्तावांची छाननी करण्याकरिता मा. मंत्री (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या छाननी समितीचा शासन निर्णय रद्द करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. विआक्षे-२०२१/प्र.क्र. १९७/उद्योग-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०३ फेब्रुवारी,२०२२

वाचा :-

१) शासन निर्णय क्र. विआक्षे-(२००६/(११६०)/उद्योग-२, दिनांक १०/०८/२००६

२) वाणिज्य व उद्योग मंत्रालय, वाणिज्य विभाग, भारत सरकार यांचे ज्ञापन क्र F- १/५/२०१६ SEZ, दिनांक १४/०७/२०१६

प्रस्तावना:-

केंद्र शासनाचा विशेष आर्थिक क्षेत्र स्थापन करण्याबाबतचा विशेष आर्थिक क्षेत्र अधिनियम २००५ हा दिनांक २३/०६/२००५ रोजी प्रसिध्द करण्यात आला. सदर अधिनियमामध्ये विशेष आर्थिक क्षेत्र विकसित करण्याबाबतच्या प्रस्तावांची राज्य शासनामार्फत केंद्र शासनास शिफारस करणे आवश्यक असल्याची अट घालण्यात आली होती. त्यादृष्टीने प्रस्तावांची शिफारस करण्यापूर्वी विकासकांकडून क्षेत्र आरक्षणाबाबत, विशेष आर्थिक क्षेत्र पर्यावरणदृष्टया संवेदनशील क्षेत्रात प्रसिध्द केलेले आहे किंवा कसे, पाणी / वीज वगैरेसारख्या सर्व सुविधा उपलब्ध आहेत किंवा उपलब्ध होवू शकतील, याबाबतची पूर्तता अपेक्षित असून याबाबतची शहानिशा केल्यानंतरच सदर प्रस्तावाची शिफारस केंद्र शासनाकडे करण्याकरिता मा. मंत्री (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १०/०८/२००६ च्या शासन निर्णयान्वये विभागीय छाननी समितीचे गठन करण्यात आले होते. विशेष आर्थिक क्षेत्रास ज्या सवलती दिल्या जातात किंवा इतर विभागाकडून ज्या परवानग्या घ्याव्या लागतात त्या जलद गतीने मिळाव्यात यास्तव सदर समितीमध्ये नगर विकास विभाग, महसूल विभाग तसेच महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांचा सदस्य म्हणून समावेश करण्यात आला होता.

२. वरीलप्रमाणे छाननी समितीचे गठन करण्याबाबतचा शासन निर्णय निर्गमित होवून १५ वर्षापेक्षा अधिक कालावधी झालेला आहे. केंद्र शासनाचा विशेष आर्थिक क्षेत्र अधिनियम २००५ हा प्रसिध्द झाल्यानंतर त्या वेळेस सदर योजनेस मोठया प्रमाणात प्रतिसाद मिळाल्याने सन २००६ ते २००८ या कालावधीत शासनास प्राप्त होणाऱ्या प्रस्तांवाची संख्या ही खूप जास्त होती. सन २००८ नंतर जागतिक मंदी, कर रचनेतील बदल तसेच विशेष आर्थिक क्षेत्र अधिनियम २००५ अंतर्गत विशेष आर्थिक क्षेत्राकरिता आयकर कलम १० एए अंतर्गत सवलतीचा कालावधी दिनांक ३१/०३/२०२० रोजी संपुष्टात येणे, इत्यादी कारणांमुळे विशेष आर्थिक क्षेत्र विकसित करण्याची मागणी त्या तुलनेत कमी

झाली आहे. तसेच विशेष आर्थिक क्षेत्रा बाबतचे परवाने हे सुध्दा एक खिडकी योजनेंतर्गत एकाच ठिकाणी सुलभतेने उपलब्ध होतात. त्यामुळे सद्य:परिस्थितीत या विषयी प्राप्त होणारे प्रस्ताव चक्रीय पध्दतीने छाननी समितीसमोर सादर करुन त्याप्रमाणे केंद्र शासनास शिफारस करण्याची कार्यवाही करण्यामध्ये बराच कालापव्यय होत असल्याने दिनांक १०/०८/२००६ चा शासन निर्णय रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अ) विशेष आर्थिक क्षेत्र स्थापित करण्याबाबतची शिफारस केंद्र शासनास करण्यासंदर्भात छाननी समितीच्या गठणाबाबत निर्गमित केलेला दिनांक १०/०८/२००६ चा शासन निर्णय याव्दारे रद्द करण्यात येत आहे.

ब) विशेष आर्थिक क्षेत्र स्थापित करणे अथवा यापूर्वी स्थापित झालेले विशेष आर्थिक क्षेत्र विना-अधिसूचित, अंशत अधिसूचित त्याचप्रमाणे अस्तित्वातील क्षेत्रामध्ये वाढ अथवा घट करण्याबाबत केंद्र शासनाच्या वाणिज्य व उद्योग मंत्रालयाच्या दिनांक १४/०७/२०१६ च्या ज्ञापनात नमूद मार्गदर्शक सूचनानुसार उद्योग संचालनालयाने याबाबतचे प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०३१६०३१६१७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRY, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2022.02.04 16:21:28 +05'30'

**( संजय देगांवकर )**
**सह सचिव (उद्योग), महाराष्ट्र शासन**

**प्रति :**

१) मा. मंत्री (उद्योग व खनिकर्म) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्य मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-१), मंत्रालय , मुंबई.
६) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
८) निवडनस्ती (उद्योग-२)